शैक्षणिक वर्ष २०१२ -१३
अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात
नवीन अभ्यासक्रम / विषयांना मान्यता

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
शासन आदेश क्रमांक एनजीसी २०११/(२०१ /११)/मशि-४
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२
दिनांक : ७ सप्टेंबर, २०११

**पहा:-** १. पुणे विद्यापीठ, पुणे यांचे पत्र क्र. सीए/१४५२, दि. ३०.४.२०११.

**शासन आदेश**

महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम, १९९४ मधील कलम ८३(५) नुसार ८२(४) प्रमाणे तसेच शासन निर्णय दिनांक ३.८.२०११ नुसार राज्यातील विद्यापीठांनी अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात नवीन अभ्यासक्रम / विषय मान्यतेसाठीचे प्रस्ताव शासनास सादर करावयाचे असतात, त्यानुसार शैक्षणिक वर्ष २०१२-१३ साठी राज्यातील विद्यापीठांकडून प्राप्त झालेल्या प्रस्तावास विद्यापीठाची शिफारशी विचारात घेऊन महाराष्ट्र विद्यापीठ अधिनियम १९९४ मधील कलम ८२(५) व ८३(५) व शासन निर्णय दि. ३.८.२०११ अन्वये शासनास प्राप्त अधिकारानुसार अस्तित्वात असलेल्या महाविद्यालयात पुढील विवरणात नमूद केल्यानुसार नवीन अभ्यासक्रम / विषयांस व अतिरिक्त तुकडयांना खालील अटी व शर्तीच्या अधिन राहून कायम विना अनुदान तत्वावर मंजूरी देण्यात येत आहे.

| अ.क्र. | संस्थेचे / महाविद्यालयाचे नाव | मान्यता दिलेले नवीन अभ्यासक्रम/विषय |
|---|---|---|
| **पुणे विद्यापीठ, पुणे** | | |
| १. | मा. बाळासाहेब जाधव कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, आळे, ता. जुन्नर, जि. पुणे. | एम.कॉम. (अॅडव्हान्स कॉस्ट अकाउटींग अॅण्ड सिस्टीम), एम.सी.ए. (कॉमर्स) बी.कॉम.-१ अतिरिक्त तुकडी |
| २. | एसीएन कॉलेज ऑफ सायन्स अॅण्ड कॉमर्स सर्वे नं ४८/७, नऱ्हेगाव, पुणे | एम.एस्सी.(कॉम्प्युटर सायन्स) |
| ३. | प्रतिभा महिला प्रतिष्ठान, द न्यु मिलेनियम इंग्लीश मिडीयम स्कुल कॅम्पस, नवी सांगवी, ता. पिंपरी चिंचवड, जि. पुणे. | बी.ए. बी.कॉम. |
| ४. | एटीएसएस कॉलेज ऑफ बिझनेस स्टडीज अॅण्ड कॅम्प्युटर अॅप्लिकेशन, सी/२, एम.आय.डी.सी., चिंचवड, ता. हवेली, जि. पुणे | बी.एस्सी.(कॅम्प्युटर सायन्स) |
| ५. | टिकाराम जगन्नाथ कला, वाणिज्य व विज्ञान महाविद्यालय, एलफिस्टन रोड, खडकी, ता. हवेली, जि. पुणे. | एम.एस्सी.(कॉम्प्युटर सायन्स)-१ अतिरिक्त तुकडी |

अटी व शर्ती:-

१. अस्तित्वात असलेल्या ज्या महाविद्यालयात अभ्यासक्रम / विषय व अतिरिक्त तुकडया मंजूर करण्यात आलेल्या आहेत, त्या महाविद्यालयाने त्यांच्या विभागीय सहसंचालकांकडे ते भविष्यात कोणत्याही परिस्थितीत अनुदानाची मागणी करणार नाहीत असे हमीपत्र रु. १००/- च्या नॉन ज्युडीशियल स्टँप पेपरवर सादर करावे.

२. संबंधित विभागीय सहसंचालकांचे हमीपत्र सादर केल्याविषयीचे प्रमाणपत्र प्राप्त झाल्याशिवाय विद्यापीठांने संलग्नतेची प्रक्रिया सुरु करु नये.

३. विद्यापीठाने विहित केलेल्या निकषानुसार व विद्यापीठ अनुदान आयोगाने विहित केलेल्या शैक्षणिक पात्रतेनुसार महाविद्यालयांनी, अध्यापक वर्ग/ कर्मचारी वर्ग नेमणे आवश्यक असून इतर सर्व आवश्यक पायाभूत सोयी उपलब्ध कराव्यात व त्याची खात्री विभागीय सहसंचालकानी १५ सप्टेंबर पर्यंत करावी व तद्नंतरच उपरोक्त अट क्रमांक २ मधील प्रमाणपत्र विद्यापीठास द्यावे.

४. महाविद्यालयांने कोणत्याही परिस्थितीत मंजूर प्रवेश क्षमतेपेक्षा जास्त प्रवेश देऊ नयेत.

५. नवीन अभ्यासक्रम/ विषय व अतिरिक्त तुकडया मंजूर करण्यात आलेल्या महाविद्यालयांनी ज्यांची स्थापना होऊन ५ वर्ष झालेली आहेत त्यांनी एक वर्षात व ज्यांची ५ वर्ष पुर्ण झालेली नाहीत त्यांची ५ वर्ष पुर्ण होताच एक वर्षात NAAC ॲक्रिडियेशन प्राप्त करुन घ्यावे व ते या कालावधीत न मिळवल्यास सदर अभ्यासक्रम / विषयाची मान्यता आपोआप रद्द होईल.

६. महाराष्ट्र विद्यापीठ कायदा १९९४ मधील कलम ८२ (५) व ८३ (५) नुसार ही मान्यता शैक्षणिक वर्ष २०१२-१३ पासून देण्यात येत आहे.

२. विद्यापीठाचे संलग्निकरण देण्याबाबत आवश्यक असलेली पुढील कार्यवाही विद्यापीठांनी करण्यापूर्वी शासनाच्या मान्यतेबाबतचे आदेश शासनाच्या संकेतस्थळावर अवलोकन केल्याशिवाय व विभागीय सहसंचालकाचे प्रमाणपत्र मिळाल्याशिवाय संलग्नता देण्याची प्रक्रिया सुरु करु नये. विद्यापीठांनी संलग्नतेबाबतचा पूर्तता अहवाल संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे व संबंधित विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य यांना पाठवावा.

३. संबंधीत विद्यापीठांनी व विभागीय सहसंचालकांनी नवीन अभ्यासक्रम / विषयांबाबतचा नियतकालिक आढावा घेवून सदर अभ्यासक्रम/विषयांसाठी मंजूर विद्यार्थी संख्येच्या ५० टक्के किंवा त्यापेक्षा कमी विद्यार्थी दिसून आल्यास सदर अभ्यासक्रम / विषय व अतिरिक्त तुकडया रद्द समजून तसे शासन व विद्यापीठाच्या माहितीने विभागीय सहसंचालकांनी आदेश काढावेत.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(वि. गो. चांदेकर)
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

प्रत,

१) कुलसचिव, पुणे विद्यापीठ
२) संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
३) विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, पुणे
४) संबंधित संस्था,
५) निवड नस्ती (मशि-४)